**मृद व जलसंधारण विभाग अंतर्गत दक्षता व गुण नियंत्रण विभागाची शासन स्तरावरील समिती स्थापन करणे बाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**मृद व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:संकिर्ण-२०२४/प्र.क्र. ११२/जल-१**
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
**दिनांक: १६ मार्च,२०२४.**

**वाचा:**

१. मृद व जलसंधारण विभाग, शासन निर्णय क्र.आस्थाप-२०१६/प्र.क्र.८८(भाग-९)/जल-२, दि.३१/०५/२०१७.
२. मृद व जलसंधारण विभाग शासन निर्णय क्र. आस्थाप २०१८/ प्र.क्र.१३६ दि.२८/०८/२०१८
३. मृद व जलसंधारण विभाग शासन निर्णय क्र. आस्थाप २०१३/ प्र.क्र.१४ दि.१/०३/२०१९
४. प्रादेशिक दक्षता व गुण नियंत्रण अधिकारी, औरंगाबाद यांचे पत्र क्र. दवगुनिप(मृजव)/ औ/ २९ दि.२८/०१/२०२२

**प्रस्तावना:**

मृद व जलसंधारण विभाग, शासन निर्णय क्र.आस्थाप-२०१६/प्र.क्र.८८(भाग-९)/जल-२, दि.३१/०५/२०१७ अन्वये राज्यात मृद व जलसंधारण विभागामार्फत ० ते ६०० हेक्टर सिंचन क्षमते पर्यंतच्या योजना आखल्या जातात. तसेच सदर योजनांच्या गुणनियंत्रण बाबत कार्यवाहीसाठी जलसंधारण विभागाअंतर्गत प्रादेशिक दक्षता व गुण नियंत्रण विभागाची स्थापना करण्यात आलेली आहे. या कामामध्ये आर्थिक गुंतवणूक, नैसर्गिक संसाधनाचा वापर व बांधकामाची तांत्रिक क्लिष्टता लक्षात घेता, केलेली बांधकामे टिकाऊ आणि स्थिर असल्याची खात्री करण्यासाठी कामाच्या गुणवत्तेवर योग्य नियंत्रण असणे आवश्यक आहे.

जलसंधारण विभागाअंतर्गत संपूर्ण राज्यासाठी एक मुख्य दक्षता व गुण नियंत्रण अधिकारी हे असून त्यांचे अंतर्गत प्रादेशिक दक्षता व गुणनियंत्रण अधिकारी, नागपूर/ औरंगाबाद/ पुणे ही तीन कार्यालये आहेत. विभागातील कामाची व्याप्ती पाहता शासन स्तरावर गुणनियंत्रणाबाबत नियोजन व कार्यपद्धतीचा अभ्यास होणे आवश्यक आहे. तसेच मृद व जलसंधारण विभागातंर्गत कामांची संख्या विचारात घेता गुण नियंत्रण व दक्षता विभाग अंतर्गत स्वतंत्र अद्यावत तंत्रज्ञानाने युक्त, धरण सुरक्षितता, साधन, निगराणी, पर्यवेक्षण नियंत्रण आणि माहिती संपादन, माहिती स्थानांतर (Instrumentation, surveillance, Scads and Data Transfer), गुण नियंत्रण

कार्यपध्दती, उच्च तंत्रज्ञानाने सुसज्ज अद्यावत प्रयोगशाळा (लॅब) असणे आवश्यक आहे. तसेच धरण सुरक्षितता निगडित बाबी, गुणनियंत्रणाचे कामकाज वाढल्यामुळे व टेस्टिंगची कामे करण्याच्या दृष्टीने दक्षता व गुणनियंत्रण समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:**

प्रादेशिक दक्षता व गुणनियंत्रण अधिकारी कार्यालयाच्या कर्तव्ये व जबाबदाऱ्या खालीलप्रमाणे आहेत:

१. मुख्य दक्षता व गुणनियंत्रण अधिकारी यांनी सोपविलेली कामे पाहणे.
२. प्रादेशिक दक्षता व गुणनियंत्रण अधिकारी हे राज्यातील चालू / चौकशीच्या कामांवर गुणनियंत्रण चाचण्या घेऊन वेळोवेळी कार्यवाही करतील.
३. प्रादेशिक दक्षता व गुणनियंत्रण अधिकारी हा त्या प्रादेशिक विभागाचा प्रमुख प्रशासकीय अधिकारी म्हणून काम पाहील आणि तो प्रकरणपरत्वे आपल्या प्रादेशिक विभागातील व विभागाच्या अधिकाऱ्यांच्या प्रभाराखाली असलेल्या जलसंधारण प्रकल्पाशी निगडीत बांधकामाचे दर्जेदार व गुणवत्तापूर्वक काम करुन घेण्यासाठी क्षेत्रीय अधिकाऱ्यावर व्यावसायिक नियंत्रण ठेऊन मार्गदर्शन करतील.
४. प्रादेशिक दक्षता व गुणनियंत्रण अधिकारी हे सचिव, मृद व जलसंधारण / मुख्य दक्षता व गुण नियंत्रण अधिकारी यांच्या थेट नियंत्रणाखाली राहतील.
५. प्रादेशिक दक्षता व गुणनियंत्रण अधिकारी हे पद प्रादेशिक जलसंधारण अधिकारी या पदास समकक्ष असेल. प्रादेशिक दक्षता व गुण नियंत्रण पथक कार्यालयास चौकशीचे आदेश देण्यासाठी सचिव (मृद व जलसंधारण) / मुख्य दक्षता व गुणनियंत्रण अधिकारी हे समक्ष प्राधिकारी राहतील. असे असले तरी दक्षता व गुण नियंत्रणाची बाब म्हणून प्रादेशिक दक्षता व गुणनियंत्रण अधिकारी हे त्यांना वाटेल त्या कामांचे यहाचिक (Random) एकतर स्वतः अथवा त्यांच्या अधिकाऱ्याकरवी तपासणी करु शकतील. या पध्दतीने ते मृद व जलसंधारणाची वार्षिक किमान १० टक्के कामे तपासतील व त्याबाबतच्या नोंदी आणि आवश्यकतेप्रमाणे कार्यवाही करतील.
६. शासन स्तरावरुन चौकशीसाठी सोपविलेल्या प्रकरणाचे चौकशी अहवाल कालमर्यादेत शासनास सादर करतील. विषयक प्रकरणामध्ये दोषारोप पत्रे निश्चित करुन पुराव्यासह दोषारोप पत्रे शासनास सादर करण्याची जबाबदारी असेल.
७. गुण नियंत्रणाच्या बाबतीत सुध्दा प्रादेशिक दक्षता व गुण नियंत्रण अधिकारी हे प्रादेशिक विभागाच्या अखत्यारीतील चालू / चौकशीच्या कामावर गुण नियंत्रण चाचण्या घेवून वेळोवेळी कार्यवाही करतील.

८. प्रादेशिक विभागातील मृद व जलसंधारणाच्या कामाची गुणवत्ता उच्च प्रतीची राखणेसाठी कार्यक्षेत्रावरील अधिकाऱ्यांना मार्गदर्शन करुन व त्यांच्याकडून कामाची गुणवत्ता उच्च प्रतीची करुन घेण्याची जबाबदारी पार पाडतील.

९. प्रादेशिक दक्षता व गुण नियंत्रण अधिकारी यांना आपल्या प्रादेशिक विभागातील कोणत्याही स्थानिक प्राधिकरणाशी मग ते नागरी असो की सैनिक असो, थेट पत्रव्यवहार करण्यास प्राधिकृत करण्यात आले आहे. तो क्षेत्राच्या / ब्रिगेडच्या महासमादेशक अधिकाऱ्यांशी त्या क्षेत्राच्या समादेशक/ बांधकाम अभियंत्या मार्फत पत्रव्यवहार करील आणि इतर सर्व दुय्यम अधिकाऱ्यांशी थेट पत्रव्यवहार करील.

**मृद व जलसंधारण विभागासाठी दक्षता व गुण नियंत्रण बाबत शासन स्तरावर खालीलप्रमाणे समिती स्थापन करण्यात येत आहे.**

| अ.क्र | अधिकारी | पदनाम |
|---|---|---|
| १ | अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव, मृद व जलसंधारण विभाग | अध्यक्ष |
| २ | सह सचिव, मृद व जलसंधारण विभाग | उप अध्यक्ष |
| ३ | प्रादेशिक दक्षता व गुण नियंत्रण अधिकारी, पुणे | सदस्य |
| ४ | प्रादेशिक दक्षता व गुण नियंत्रण अधिकारी, नागपूर | सदस्य |
| ५ | प्रादेशिक दक्षता व गुण नियंत्रण अधिकारी, छ.संभाजीनगर | सदस्य |
| ६ | अवर सचिव, मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय | सदस्य सचिव |

**समितीची कार्यकक्षा :**

१. गुण नियंत्रण व दक्षता विभाग प्रयोगशाळा समितीची कार्यकक्षा खालील प्रमाणे राहील .

२. सर्व प्रादेशिक दक्षता व गुणनियंत्रण कार्यालयाने दर तिमाही अहवाल चौकशी प्रकरणाची व प्रगतीपथा वरील काम केलेल्या गुणनियंत्रणाबाबतचा अहवाल सादर केल्यावर त्याबाबत निर्णय देणे.

३. सर्व प्रादेशिक दक्षता व गुणनियंत्रण विभागात गुण नियंत्रण यंत्रणा/ मशिनरी बसविण्याबाबत प्रस्तावास मान्यता देऊन शासनास शिफारस करणे.

४. धरणावर संगणक प्रणालीद्वारे धरण सुरक्षितता यंत्रणा )Dam Monitoring), पाणी पातळी मोजमाप) Real time Data Acquisition) यंत्रणा राबविण्याच्या कार्यपद्धतीस मान्यता देऊन शासनास शिफारस करणे.

५. प्रादेशिक दक्षता व गुणनियंत्रण कामकाजकार्यपद्धती बाबत/ अडचणी सोडविण्यासाठी निर्णय घेऊन शासनास शिफारस करणे.

६. धरण सुरक्षिततेबाबत उपस्थित मुद्द्यांचे राज्याचे विभाग नोडल अधिकारी यांच्या समन्वयाने निर्दालन करणे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक क्रमांक २०२४०३१६१८३२०८०९२६ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAKASH
NILKANTHRAO PATIL

Digitally signed by PRAKASH NILKANTHRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT,
2.5.4.20=a7dc90f966c671a9acd0a599ee5fc497272e775d33643b14725c6a77432c673f, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=F1EC28A96B2A52575AE4CCCA512D1723F249D503AE71CF458BA4863AACFFBF62, cn=PRAKASH NILKANTHRAO PATIL
Date: 2024.03.16 18:41:17 +05'30'

**( प्र. नि. पाटील )**
**कार्यकारी अभियंता तथा अवर सचिव**
**महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री, यांचे अप्पर मुख्य सचिव.
३) मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
४) सर्व मा.संसद सदस्य, विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य.
५) सर्व मा.मंत्री/राज्यमंत्री यांचे खासगी सचिव
६) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
७) सर्व मंत्रालयीन विभागांचे अप्पर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव.
८) मा.मंत्री (मृद व जलसंधारण) यांचे खाजगी सचिव
९) मा. सचिव (मृद व जलसंधारण) यांचे स्वीय सहाय्यक
१०) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरीक्षण), महाराष्ट्र राज्य,मुंबई.
११) आयुक्त, मृद व जलसंधारण, जलसंधारण आयुक्तालय, औरंगाबाद.
१२) व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र जलसंधारण महामंडळ, औरंगाबाद.
१३) अपर आयुक्त जलसंधारण तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र, सर्व.
१४) प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, सर्व.
१५) जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, सर्व.
१६) जिल्हा जलसंधारण अधिकारी, ल.पा. जिल्हा परिषद, सर्व.
१७) निवडनस्ती (जल-१)